**प्रमाणपत्र /पदविकाधारकांसाठी विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या किरकोळ पशुवैद्यकीय सेवा...**
**पशुवैद्यकीय दवाखान्यास पुरवठा केलेल्या औषधींच्या विनियोगाबाबत...**

आयव्हीसी **महाराष्ट्र शासन**
क्रमांक :[illegible]-२०११/ प्र.क्र. ३४६/पदुम-४
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व
मत्स्यव्यवसाय विकास विभाग.
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.
दिनांक २० जुलै- २०११

**वाचा :**

(१) कृषी व पदुम विभागाची अधिसूचना क्रमांक आयव्हीसी/१००६/प्र.क्र.३२ (भाग-२)/पदुम-४ दि.२७/८/२००९
(२) कृषी व पदुम विभागाची अधिसूचना क आयव्हीसी १००६/प्र.क.३२ (भाग-२)/पदुम-४ दि. ४/८/२०१०
(३) कृषी व पदुम विभागाचे परिपत्रक क्र.आयव्हीसी १००६/प्र.क.३२ (भाग-२)/पदुम-४ दि. ८/३/२०११
(४) आयुक्त पसं, पुणे यांचे पत्र क.पप्र.क.प्र-१/वशिक्र-११९५/भाग-४, १०२७/३३०२/११ पसं-१३, पुणे-१ दिनांक १४/६/२०११

**परिपत्रक :-**

उपरोक्त वाचा मधील अधिसूचना क १ व २ अन्वये प्रमाणपत्र /पदविकाधारकांसाठी किरकोळ पशुवैद्यकीय सेवा विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या आहेत.

सध्या राज्यामध्ये श्रेणी-२ चे २८५३ पशुवैद्यकीय दवाखाने आहेत; तसेच श्रेणी-१, व श्रेणी-२ च्या दवाखान्यांत पशुधन पर्यवेक्षक / सहाय्यक पशुधन विकास अधिकारी / पशुधन विकास अधिकारी (गट-ब) कार्यरत आहेत. शासनाकडून सदरच्या दवाखान्यांना निरनिराळया औषधींचा पुरवठा करण्यात येतो. दिनांक २७/८/२००९ च्या अधिसूचनेमध्ये औषधींचा विनियोग याबाबींचा समावेश नसल्यामुळे दैनंदिन दवाखान्यातील कामकाजामध्ये अडचणी निर्माण होत आहेत. असे निदर्शनास आले आहे.

या संदर्भात स्पष्ट करण्यात येते की, "पशुवैद्यकीय दवाखान्यांस शासनामार्फत पुरवठा केलेल्या औषधींचा पशुधन पर्यवेक्षक / सहाय्यक पशुधन विकास अधिकारी /पशुधन विकास अधिकारी (गट-ब) यांना नोंदणीकृत पशुवैद्यकाच्या देखरेखीखाली व निर्देशानुसार वापरणेची या व्दारे अनुमती देण्यात येत आहे".

तसेच परिपत्रक क्र.आयव्हीसी १००६/प्र.क्र.३२ (भाग-२)/पदुम-४ दि. ८/३/२०११ नुसार करण्यात आलेले स्पष्टीकरण यास लागू राहील. तसेच या बाबींसाठी नोंदणीकृत पशुवैद्यक प्रत्यक्ष उपस्थित राहण्याची आवश्यकता नाही.

(प्रणाली चिटणीस)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत:**

मा. मंत्री, (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक
मा. राज्यमंत्री, (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास) यांचे स्वीय सहाय्यक
आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे १
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, अकोला
निबंधक, महाराष्ट्र पशुवैद्यक परीषद, नागपुर
प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, (सर्व)
जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त (सर्व) /
जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)